**अकृषि विद्यापीठातील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी तसेच अशासकीय अनुदानित / विनाअनुदानित महाविद्यालयातील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना धारणाधिकार मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्रशिक्षण विभाग,

शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०११/(५७ /२०११)विशि-१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १५ मार्च , २०११

संदर्भ : १) विद्यापीठ अनुदान आयोगाची दि.३० जून, २०१० ची अधिसूचना

२) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१०/(३१२/२०१०)/विशि-१,दि. २० मे, २०१०

३) शासन निर्णय क्र.नियुक्ती-२०१०/(प्र.क्र.३३७/२०१०)/मशि-५, दि.२३ ऑगस्ट, २०१०

४) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०११/(२५/११)/विशि-१, दि.१५ फेब्रुवारी, २०११

५) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१०/(५०२/१०)/विशि-१, दि.५ मार्च, २०११

**प्रस्तावना :** सदर प्रकरणी शासनाच्या क्र.नियुक्ती-२०१०/(प्र.क्र.३३७/२०१०)/मशि-५, दि.२३ ऑगस्ट, २०१० च्या निर्णयान्वये सर्व अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयाकडे सविस्तर निर्देश देण्यात आलेले आहे. तथापि , राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठांच्या परिनियमामध्ये शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी धारणाधिकार मंजूरी बाबत व धारणाधिकाराच्या कालावधीबाबत विद्यापीठ निहाय वेगवेगळया तरतुदी आहेत. याबाबत सर्व अकृषि विद्यापीठाच्या दैनंदिन प्रशासनासाठी तयार करण्यात आलेले परिनियम (Statutes) जो पर्यन्त सर्वसामान्य परिनियम (Common Statutes ) तयार करुन ते लागू करण्यात येत नाहीत तोपर्यन्त शासनाच्या क्र. संकीर्ण-२०१०/(३१२/२०१०)/विशि-१, दि.२० मे, २०१० च्या निर्णयान्वये सर्व शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी महाराष्ट्र नागरी सेवा नियम-१९८१ मधील सेवेच्या सर्वसाधारण शर्ती, नियम लागू करण्यात आलेल्या आहेत. त्यामुळे या संदर्भात परिनियमामधील तरतुदी नुसार धारणाधिकाराची केवळ व्याख्या करण्यात आल्यामुळे धारणाधिकार किती कालावधीसाठी मंजूर करावा याबाबत असलेला संभ्रम निर्माण होत होता. म्हणूनच अकृषि विद्यापीठाबरोबरच अनुदानीत / विना अनुदानीत महाविद्यालयाच्या शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी धारणाधिकाराबाबत महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१ मधील तरतुदी नुसार एकसूत्रता आणणे शक्य होणार आहे. यास्तव सर्व अकृषि विद्यापीठाच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यां बरोबरच अनुदानीत / विनाअनुदानीत संलग्नित महाविद्यालयाच्या शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी धारणाधिकार मंजूर करण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेण्यात आला. तथापि, सदर शासन निर्णयामधील धारणाधिकार मंजूर करण्याबाबतच्या अटी व शर्तीच्या व्यतिरिक्त खालील सुधारीत अटी व शर्ती लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

सदर प्रकरणी प्रस्तावनेत नमूद केलेल्या सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

i) सर्व अकृषि विद्यापीठे व संलग्नित अनुदानीत / विनाअनुदानीत अशासकीय महाविद्यालयामधील शिक्षक व शिक्षकेतर संवर्गातील कर्मचाऱ्यांसाठी शासनाच्या क्र.नियुक्ती-२०१०/(प्र.क्र.३३७/२०१०)/ मशि-५, दि.२३ ऑगस्ट, २०१० च्या निर्णयान्वये अनुदानीत व विनाअनुदानीत महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी २ वर्षाचा आणि विद्यापीठ कायद्यातील वैधानिक पदावरील (Statutory Post ) नियुक्ती झाल्यास त्याबाबतीत ५ वर्षाचा धारणाधिकार मंजूर करण्यात आला असून उक्त कालावधीनंतर तो आपोआप संपूष्टात येईल.

तथापि, संलग्नित अनुदानीत व विनाअनुदानीत अशासकीय महाविद्यालयातील प्राचार्य पदावरील नियुक्तीच्या दृष्टीने सदर २ वर्षाचा धारणाधिकाराचा कालावधी एका संस्थेतून दुसऱ्या संस्थेमधील नियुक्तीच्या दृष्टीने सदर आदेशान्वये मंजूर केलेला धारणाधिकाराचा कालावधी कमी पडत असल्यामुळे अशा महाविद्यालयात प्राचार्य पदावरील नियुक्तीसाठी नियमित (Regular) विहीत पात्रताधारक (Qualified) आणि अनुभवी (Experience) उमेदवार उपलब्ध होत नाहीत. यास्तव सदर पद सावधि नियुक्ती पद (Tenure Post ) करण्यात आले आहे. म्हणून उक्त शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या २ वर्षापर्यन्तच्या धारणाधिकाराचा कालावधी वाढवून तो ५ वर्षापर्यन्त करण्यात येत आहे.

ii) विज्ञान तथा अनुषंगिक विषयातील पात्रता व अनुभव धारण करणारे उमेदवार कला व मानववंशशास्त्र (Arts & Humanities) वाणिज्य, कॉम्पयुटर ॲप्लीकेशन (Computer Application) या विषयातील महाविद्यालयामध्ये प्राचार्य पदासाठी पात्र असतील.

संदर्भाधीन दि.१५ फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये प्राचार्यांना शैक्षणिक वर्षामध्ये विवक्षित तासिका घेण्यापासून सूट देण्यात आली असली तरी अशा प्राचार्यांना सदर महाविद्यालयामध्ये आवश्यकते प्रमाणे त्यांच्याकडील विज्ञान विषयातील पात्रतेऐवजी त्यांना पर्यावरण विषयामध्ये (Environmental Subject) अध्यापन करण्याची ऐच्छिक मुभा असेल.

iii) संलग्नित अशासकीय महाविद्यालयामध्ये जे उमेदवार प्राचार्य म्हणून कार्यरत आहेत किंवा प्राचार्य पदावरुन सेवानिवृत्त झालेले आहेत (ज्यांच्या नियुक्त्या संचालक, उच्च शिक्षण यांचेकडून अथवा विद्यापीठाने मान्यता दिली आहे अशांसह ) अशा पात्र उमेदवारांच्या नियुक्त्या / पुनर्नियुक्त्या विविध अशासकीय महाविद्यालयामध्ये रिक्त असलेल्या पदांवर प्रकरण परत्वे त्यांच्या वयाच्या ६५ वर्षे वयापर्यन्त करण्यात येऊ शकते. तथापि, अशा सेवानिवृत्ती नंतरच्या पुनर्नियुक्त्या फक्त कायम विनाअनुदानीत तत्वावरील महाविद्यालयासाठी लागू राहील.

प्रस्तुत प्रकरणी असेही स्पष्ट करण्यात येते की, संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये धारणाधिकारा बाबतीत विहीत केलेल्या अट क्र.३ मधील प्राचार्यांच्या संदर्भातील तरतूद वगळता इतर सर्व अटी व शर्ती सर्व अकृषी विद्यापीठे व संलग्नीत अनुदानीत व विना अनुदानीत अशासकीय महाविद्यालये व संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना जशाच्या तशा लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्रमांक २०११०३१६२२५९१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

स्वाक्षरी/-
( राजाराम गो.जाधव )
शासनाचे उप सचिव

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
४) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
५) महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
६) सर्व सहसचिव / उपसचिव उच्च व तंत्रशिक्षण विभाग
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
९) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) मा. मंत्री ,(उ.व तं.शि), यांचे खाजगी सचिव
१३) मा. राज्यमंत्री, (उ.व तं. शि.), यांचे खाजगी सचिव.
१४) अवर सचिव / कक्ष अधिकारी , उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१५) निवड नस्ती